महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादीत,वरळी,मुंबईच्या संचालक मंडळावर नियुक्ती करणेबाबत.
प्रधान सचिव (विशेष) गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक:पीएचसी-०१०३/प्र.क्र.३/पोल-७,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ११ ऑगस्ट, २००३.

वाचा:- १) शा.नि.क्र.पीएचसी-०११७/सीआर-२१७/पोल-७, दिनांक: २७ जून,१९९६.
२) शा.नि.गृह विभाग, क्र.पीएचसी-०११५/प्र.क्र.११७/पोल-७, दिनांक: ८ डिसेंबर,१९९९
३) शासननिर्णय, समक्रमांक दिनांक २८.१.२००३ व दिनांक १९ मार्च,२००३.

शासन निर्णय:- महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाचे अध्यक्ष म्हणून महामंडळाचे सर्व कामकाज अपर मुख्य सचिव,गृह विभाग यांच्याकडे येत असते तसेच गृह विभागाचे प्रमुख म्हणूनही त्यांना त्यावर देखरेख ठेवावी लागते. विभागाच्या विविध महत्त्वाच्या तातडीच्या कामामुळे, बैठकीमुळे ते सतत व्यस्त असतात. त्यामुळे त्यांना महामंडळाच्या कामकाजावर नियमितपणे व पाहिजे तितके लक्ष देणे शक्य होत नाही. महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाच्या कामकाजाबाबत शासनस्तरावर प्रामुख्याने प्रधान सचिव (विशेष),गृह विभाग यांचा संबंध येतो व महामंडळाच्या कामकाज मध्ये त्यांचा सक्रिय सहभागही असतो. त्यामुळे प्रधान सचिव (विशेष),गृह विभाग यांची या महामंडळावर संचालक म्हणून नियुक्ती केल्यास या महामंडळाचे कामकाज व विभागाचे कामकाज यात समन्वय साधणे अधिक शक्य होईल.तसेच सदर महामंडळाकडून मोठया योजना कार्यान्वित होत असून त्यावर नियमितपणे शासनाकडून पर्यवेक्षण होण्याच्या दृष्टीने प्रधान सचिव (विशेष),गृह विभाग यांची महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळावर संचालक म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(क. गो. देशपांडे)
उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग

प्रति,

अप्पर मुख्य सचिव,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
प्रधान सचिव (विशेष ),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
सचिव (व्यय),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
सचिव,नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई- ३२.
सचिव,गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई- ३२.
सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य,पोलीस गृह निर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, वरळी,मुंबई.
श्री.आर.के.झा, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र रस्ते विकास महामंडळ,मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र,मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र,नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
वित्त विभाग (सा.उ.) मंत्रालय,मुंबई.
मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
निवड नस्ती (कार्यासन पोल-७)